१५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यवाही करण्यासाठी राज्यस्तरीय समिती (State Level Committee) गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पंविआ ५०२१/प्र.क्र.७९/भाग-१/२१/आरोग्य-७**
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १७ नोव्हेंबर, २०२१

**वाचा :-**

१) भारत सरकार, आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ७(२०)/२०२०-एनएचएम-१, दिनांक ०९.०७.२०२१.
२) वित्त विभाग, अर्धशासकीय पत्र क्र. पंविआ २०२१/प्र.क्र.३३/वित्त आयोग कक्ष, दिनांक ०८.१०.२०२१.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने १५ व्या वित्त आयोगातंर्गत राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी राज्यांना निधी वितरीत करण्याचा निर्णय घेतला आहे. सदर निधी सन २०२१-२२ ते २०२५-२६ या आर्थिक वर्षात अदा करावयाचा आहे. वित्त विभागाच्या दिनांक ०८.१०.२०२१ च्या अर्धशासकीय पत्रात नमूद केल्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु. १३३१.०० कोटी इतका निधी राज्य शासनास प्राप्त होणार आहे. सदर निधी विनियोगासाठी राज्य स्तरावर तसेच जिल्हा स्तरावर समिती गठीत करणे आवश्यक आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय समिती गठीत करण्यासाठीची कार्यवाही विभागामार्फत सुरु आहे. परंतू राज्यस्तरीय समितीमधील नामनिर्देशित सदस्यांची नियुक्ती ग्रामविकास व नगरविकास विभागाच्या मान्यतेने होणार असल्याने त्यास विलंब होण्याची शक्यता आहे. तथापि, दरम्यानच्या कालावधीत केंद्र शासनास पाठविण्यात येणारे कृती आराखडे हे राज्यस्तरीय समितीच्या शिफारशीने पाठविणे बंधनकारक आहे. त्यामुळे सदर परिस्थितीत सद्यस्थितीत शासकीय सदस्यांची राज्यस्तरीय समिती (State Level Committee) गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती..

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने १५ व्या वित्त आयोगातंर्गत राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी राज्यांना निधी वितरीत करण्याच्या दृष्टीने याद्वारे राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे. सदर राज्यस्तरीय समितीची रचना पुढील प्रमाणे आहे :-

| अ.क्र. | राज्य स्तरीय समिती रचना | पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव | **अध्यक्ष** |
| २ | अ.मु.स./प्र.स./सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | समितीचे निमंत्रक |
| ३ | अ.मु.स./प्र.स./सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ४ | अ.मु.स./प्र.स./सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग | सदस्य |
| ५ | अ.मु.स./प्र.स./सचिव, नगर विकास विभाग-२ | सदस्य |
| ६ | आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | सदस्य |
| ७ | अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई | सदस्य |
| ८ | संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | **सदस्य-सचिव** |

२. नगर विकास विभाग व ग्राम विकास विभाग यांनी नागरी व ग्रामीण स्थानिक संस्थांच्या तिनही स्तरामधील निवडक प्रतिनिधी आणि पंचायत राज / नागरी स्थानिक संस्थांच्या कामकाजात सुधारणा या क्षेत्रातील तज्ञ नामनिर्देशित केल्यानंतर सदर समितीमध्ये त्यांचा अंतर्भाव करण्यात येईल.

३. राज्य स्तरीय समिती आणि जिल्हा स्तरीय समिती यांची कार्यकक्षा ही केंद्र शासनाच्या दिनांक ०९.०७.२०२१ रोजीच्या मार्गदर्शक सूचनांमध्ये नमूद केल्यानुसार राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०१२१३३०३४७५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2021.11.17 16:37:19 +05'30'

(वि. ल. लहाने)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१) अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अ.मु.स./प्र.स./सचिव, नगरविकास विभाग-२, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव, महिला व बालविकास विभाग, मंत्रालय, मुंबई

६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
८) संचालक-१, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
९) संचालक-२, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे.
१०) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
११) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई
१२) कार्यकारी संचालक, राज्य आरोग्य यंत्रणा संसाधन केंद्र, पुणे
१३) सहसंचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
१४) उपसचिव (वित्त आयोग कक्ष), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवडनस्ती ( आरोग्य -७) .